**मुंबई ॲकॅडमी ऑफ मुव्हींग इमेजद्वारे दि. १४ ते २१ ऑक्टोंबर, २०१४ या कालावधीमध्ये होणाऱ्या चित्रपट महोत्सवास करमणूक शुल्कातून माफी देणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन
# महसूल व वन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः ईएनटी-२०१४/प्र.क्र.२६२/टी-१

३२वा मजला, सेंटर १ इमारत, जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड, कुलाबा, मुंबई ४०० ००५
तारीख: १३ ऑक्टोबर, २०१४

वाचा

1) **शासन परिपत्रक क्र. ईएनटी-१०८९/प्र.क्र.३२७९/टी-१, दि. ३० एप्रिल, १९९०**
2) **शासन निर्णय क्र. ईएनटी- १००७/ प्र.क्र.१५०/टी-१, दि. ६ नोव्हेंबर, २००८**

प्रस्तावना

मुंबई ॲकॅडमी ऑफ मुव्हींग इमेजद्वारे दि. १४ ते २१ ऑक्टोंबर, २०१४ या कालावधीमध्ये होणाऱ्या चित्रपट महोत्सवादरम्यान सदर चित्रपटाचे प्रदर्शन एकपडदा अथवा बहुविध चित्रपट गृहांमध्ये आयोजित केल्यास अनुज्ञेय होणाऱ्या करमणूक शुल्क आकारणीमध्ये माफी प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय

महाराष्ट्र करमणूक शुल्क अधिनियम १९२३ मधील कलम ६ (३) अन्वये प्राप्त अधिकारान्वये मुंबई येथे मुंबई ॲकॅडमी ऑफ मुव्हींग इमेजद्वारे दि. १४ ते २१ ऑक्टोंबर, २०१४ या कालावधीमध्ये होणाऱ्या चित्रपट महोत्सवाकरिता शासनाच्या दि. ३० एप्रिल, १९९० रोजी निर्गमित परिपत्रकातील अट शिथिल करुन चित्रपट महोत्सवादरम्यान चित्रपटांचे खेळ नियमित चित्रपटगृहामध्ये आयोजित केल्यास या खेळांकरिता अनुज्ञेय करमणूक शुल्क माफी पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :**

❖ या चित्रपट महोत्सवाकरिता आयोजकांनी कॅटलॉग फी, नोंदणी शुल्क व इतर माध्यमाद्वारे शुल्क आकारणी ऐच्छिक ठेवावी. त्याप्रमाणे आयोजकांनी तसेच चित्रपटगृह चालकांनी चित्रपट

महोत्सव आयोजित करण्यात येणाऱ्या चित्रपटगृहाच्या दर्शनी भागामध्ये प्रेक्षकांकरिता ठळक अक्षरात माहिती उपलब्ध करुन द्यावी.

❖ उपरोक्त नमूद अटींची पूर्तता होते किंवा कसे याची संबंधित जिल्हाधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

❖ "मुंबई ॲकॅडमी ऑफ मुव्हींग इमेज" या चित्रपट महोत्सवाच्या खर्चाचे, प्राप्त होणाऱ्या प्रायोजकत्वाच्या रकमेचे, आकारण्यात येणाऱ्या ऐच्छिक नोंदणी शुल्क/कॅटलॉग फी याची संपूर्ण माहिती जिल्हाधिकारी कार्यालयास आयोजकांनी महोत्सव संपल्यानंतर ८ दिवसांमध्ये कळविणे बंधनकारक राहील.

जिल्हाधिकारी कार्यालयाने या कार्यक्रमापोटी शासनाने करमणूक शुल्क माफी अनुज्ञेय केल्यानंतरच्या कालावधीकरिता झालेल्या करमणूक शुल्क हानीची रक्कम परिगणित करुन त्याची माहिती विभागास द्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०१४०९४२१०२८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vidya Ramppa Hampayya

Digitally signed by Vidya Ramppa Hampayya
DN: CN = Vidya Ramppa Hampayya, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2014.10.14 10:59:25 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत, तातडीच्या आवश्यक कार्यवाहीसाठी,**

१) जिल्हाधिकारी मुंबई उपनगर

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी**

१) मा.राज्यपाल यांचे सल्लागार, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

**४)** मा. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

**५)** महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र १ मुंबई.

**६)** निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.

**७)** श्री. शाम बेनेगल, अध्यक्ष, मुंबई ॲकॅडमी ऑफ मुव्हिंग इमेज,७०४, पेनिनसुला पार्क, विरा देसाई एक्स्टेंशन मार्ग, अंधेरी (प), मुंबई - ५३.

८) निवड नस्ती.